सन २०२१-२२ मध्ये डॉ.पंजाबराव देशमुख वसतिगृह निर्वाह भत्ता योजनेकरीता निधी वितरीत करणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन ज्ञापन क्रमांक: तंनिवि-१५२१/(प्र.क्र.१०७/२१)/तांशि-३**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई - ४०० ०३२,
दिनांक: ३० मार्च, २०२२.

वाचा: -
१) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.१७ मार्च, २०२२.
२) संचालक, तंत्रशिक्षण यांचे पत्र क्र.१८/तंशिस/डीबीटी/शापत्र/२०२२/६५, दि.२३ मार्च, २०२२.

**प्रस्तावना:-**

सन २०२१-२०२२ या आर्थिक वर्षात "डॉ.पंजाबराव देशमुख वसतिगृह निर्वाह भत्ता योजना" या योजनेसाठी सुधारित अंदाजामध्ये रु.६८.०० कोटी इतका निधी मंजूर झालेला आहे. सदर योजनेंतर्गत शैक्षणिक वर्ष २०१९-२० मध्ये पात्र ठरलेल्या विद्यार्थ्यांची निर्वाह भत्त्याची प्रलंबित रक्कम अदा करण्याकरीता रु.३.३८७८ कोटी इतका निधी वितरीत करण्याचा प्रस्ताव संचालक, तंत्रशिक्षण यांनी दि.२३ मार्च, २०२२ च्या पत्रान्वये सादर केला होता. त्यास अनुसरुन रु.३.३८७८ कोटी इतका निधी आंहरित व वितरीत करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**ज्ञापन:**

"डॉ.पंजाबराव देशमुख वसतिगृह निर्वाह भत्ता योजना" या योजनेंतर्गत शैक्षणिक वर्ष २०१९-२० मध्ये पात्र ठरलेल्या लाभार्थी विद्यार्थ्यांची निर्वाह भत्त्याची प्रलंबित रक्कम अदा करण्याकरीता खाली नमूद केल्याप्रमाणे रु.३,३८,७८,०००/- (अक्षरी रुपये तीन कोटी अडतीस लक्ष अठ्ठ्याहत्तर हजार फक्त) इतका निधी संचालक, तंत्रशिक्षण, मुंबई यांना "खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून" आंहरित व वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे. तसेच आंहरित व वितरीत करावयाच्या निधीचा तपशील खालीलप्रमाणे आहे.

(रुपये कोटीत)

| २०२१-२२ करीता मंजूर निधी | वितरीत केलेला निधी | वितरीत करावयाचा निधी |
|---|---|---|
| ६८.०० | ०.०० | ३.३८७८ |

**अटी व शर्ती :-**

१) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्र.टीईएम-२०१५/प्र.क्र.५०१/तांशि-४, दि.१३ ऑक्टोबर, २०१६ व या संदर्भातील त्यानंतरच्या दि.७ ऑक्टोबर, २०१७, दि.२२ फेब्रुवारी, २०१८, दि.१८ जून, २०१८ व इतर आदेशामध्ये नमूद अटी व शर्तींचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.
२) उपलब्ध तरतूद महा डिबीटी पोर्टलवरुन पात्र विद्यार्थ्यांना विहित कार्यपध्दतीचा अवलंब करुन वितरीत करण्यात यावी.
३) यापूर्वीच्या तपासणी अहवालात काही त्रुटी/अनियमितता आढळून आली असल्यास ती तात्काळ दूर करण्यासाठी आवश्यक ती उपाययोजना संचालक, तंत्रशिक्षण यांनी करावी.

४) चूकीची अथवा खोटी माहिती भरुन शासनाकडून निर्वाह भत्ता प्राप्त करुन घेतले असल्याचे निदर्शनास आले असल्यास, अशी रक्कम वसूल करुन ती शासन जमा करण्यात यावी.

५) सदरहू निधीचे तात्काळ वाटप करावे व उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे. निधीचे वाटप करण्यास विलंब करु नये. याबाबतची जबाबदारी संचालक, तंत्रशिक्षण व सर्व विभागीय सहसंचालक, तंत्रशिक्षण यांची राहील.

३. सदर योजनेकरीता होणारा खर्च “मागणी क्र.डब्ल्यू-३, मुख्य लेखाशिर्ष २२०३-तंत्रशिक्षण, तंत्रशिक्षण १०७, शिष्यवृत्ती (००), (००)(०९) डॉ.पंजाबराव देशमुख वसतिगृह निर्वाह भत्ता योजना, (कार्यक्रम) (२२०३ ३५४२) ३४, शिष्यवृत्ती/विद्यावेतने" या लेखाशिर्षाखाली दर्शविण्यात यावा व चालू आर्थिक वर्षात मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

४. हे शासन ज्ञापन नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.१४६/१४७१, दि.२४ मार्च, २०२२ अन्वये व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.४१९/२०२२/व्यय-५, दि.२९ मार्च, २०२२ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असुन त्याचा सांकेतांक २०२२०३३०१७५७५९५१०८ असा आहे. हे शासन ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MANALI MILIND SAMANT

Digitally signed by MANALI MILIND SAMANT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e4e402a7e3426729716afaf506c8f4a9d1528c744234b2ca1302837eaee0ebdd, pseudonym=34C820519ED3F7F8CB68C7CFB30E405DBAB491DD, serialNumber=C63B0A0419F0EB37099DACA08E4CCCCE3BF49154BF43E8881E68AC2CA3A46392, cn=MANALI MILIND SAMANT
Date: 2022.03.31 11:26:31 +05'30'

**( मनाली सामंत )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) संचालक, तंत्रशिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) सहसंचालक, सर्व तंत्रशिक्षण विभागीय कार्यालये. (तंत्रशिक्षण संचालनालयामार्फत)
३) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र -१/२, मुंबई/नागपूर.
४) महालेखापाल, (लेखा परीक्षा), महाराष्ट्र -१/२, मुंबई/नागपूर.
५) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
६) अधिदान व लेखा अधिकारी, बृहन्मुंबई.
७) नियोजन विभाग/वित्त विभाग, व्यय-५/अर्थसंकल्प-८, मंत्रालय, मुंबई.
८) कक्ष अधिकारी/तांशि-४, उच्च व तंत्रशिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) कक्ष अधिकारी/साशि-१, उच्च व तंत्रशिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) निवडनस्ती/तांशि-३.